मागासवर्गीय सहकारी सुतगिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज वितरित करण्याबाबत.
सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात सूतगिरण्यांना कर्ज मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सुतगि-२०१४/प्र.क्र.११९/अजाक-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ६ सप्टेंबर, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.एमपीसी-१०९९/प्र.क्र.२४४/विघयो-२, दिनांक ३०.३.२०००.
२) शासन निर्णय,सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र. सूतगि २००३/५५५/प्र.क्र.३३/विघयो-२, दिनांक २.७.२००४
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज- २०१०/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प, दिनांक ३.४.२०१०
४) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीजीटी- २०१०/प्र.क्र.१८०/ अर्थसंकल्प, दिनांक २०.४.२०१०
५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.सूतगि- २०११/प्र.क्र.१२५/विघयो-२, दिनांक ३१.३.२०११
६) आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र,पुणे,यांचे पत्र क्र. सकस/अजाउयो-१/ अजसह/सुतगी/गौतम/नागपुर/दुसरा हप्ता मागणी/२०१४-१५/का-१४/६६२, दिनांक ४.८.२०१४

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्यात ८ व्या पंचवार्षिक योजना काळात स्थापन झालेल्या व शासनाच्या सहकार व वस्त्रोद्योग विभागाने पुरस्कृत केलेल्या सहकार क्षेत्रातील मागासवर्गीय (अनुसूचित जाती) सूतगिरण्यांना तदर्थ पद्धतीने दिर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्यात येते. यासाठी शासनाने संदर्भाधीन दिनांक ३० मार्च, २००० व दिनांक २.७.२००४ च्या शासन निर्णयान्वये सुधारित अटी व शर्ती निश्चित केलेल्या आहेत. याशिवाय सूतगिरणीतील ७०% सभासद हे अनुसूचित जातीतील असणे आवश्यक आहे. अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज या योजनेकरीता सन २०१४-१५ या आर्थिक

वर्षासाठी केलेल्या रु. ३०००.०० लाख अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी रु. २४००.०० लाख निधी अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध झालेला आहे.

अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय सहाय्य या योजनेअंतर्गत गौतम मागासवर्गीय कापुस उत्पादक सहकारी सूत गिरणी मर्या., निंबा, ता. पारशिवनी, जि. नागपुर या सूतगिरणीच्या ८६४० चात्यांचा रु. ५३००.०० लाख इतक्या प्रकल्प किंमतीस महाराष्ट्र शासन, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने शासन निर्णय क्र. सूतगि-१११२/प्र.क्र.१६७/टेक्स-१/(अ), दिनांक १३ फेब्रुवारी, २००१३ अन्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार या सुतगिरणीस रु.२६५०.०० लाख इतके दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करावयाचे आहे. त्यापैकी दिनांक १९/३/२०१३ च्या शासन निर्णयान्वये रु.२००.०० लाख इतके कर्ज मंजूर केले आहे. आयुक्त समाजकल्याण पुणे यांनी संदर्भ क्रमांक ६ वरील पत्रान्वये सदर सुतगिरीणीस रु.१४१२.११ लाख इतके अर्थसहाय्य दीर्घ मुदतीच्या कर्जाचा अंतिम हप्ता मंजूर करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. त्याअनुषंगाने गौतम मागासवर्गीय कापुस उत्पादक सहकारी सूत गिरणी मर्या., निंबा, ता. पारशिवनी, जि.नागपूर या संस्थेस दीर्घ मुदतीचे कर्ज देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

सन २०१४-१५ मध्ये अनुसूचित जाती उपाययोजने अंतर्गत अनुसूचित जातीच्या सहकारी सुतगिरण्यांना द्यावयाच्या दीर्घ मुदतीच्या कर्जासाठी प्राप्त रु.२४००.०० लाख तरतुदीपैकी शिल्लक असलेल्या निधीतून गौतम मागासवर्गीय कापुस उत्पादक सहकारी सूत गिरणी मर्या., निंबा, ता. पारशिवनी, जि. नागपुर या सूतगिरणीस रु.१२००.०० लाख (रुपये बारा कोटी) एवढे दीर्घ मुदतीचे कर्ज तदर्थ तत्त्वावर मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अदा करण्यासाठी आयुक्त समाजकल्याण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यांस देण्यात येत आहेत.

३. या बाबींवर होणारा खर्च पुढीलप्रमाणे नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा:-

६२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणासाठी कर्जे
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
८०० - इतर कर्जे, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,
राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.)
(०१)(०१) अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना कर्जे (वि.घ.यो.)
(६२२५ ०२२ २)
५५ कर्जे व आगाऊ रकमा मागणी क्रमांक एन-४

४. संदर्भाधीन शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०४१३५३४५५२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2014.09.17 10:29:37 +05'30'

**(सिध्दार्थ अ.झाल्टे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२) संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेय / लेखा परीक्षा ) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
५) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
६) सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण,पुणे/नागपूर
७) जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था,,पुणे/नागपूर
८) प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) वित्त विभाग (अर्थोपाय/अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.
१०) अध्यक्ष, गौतम मागासवर्गीय कापुस उत्पादक सहकारी सूत गिरणी मर्या., निंबा, ता. पारशिवनी, जि. नागपुर
११) निवड नस्ती- अजाक-१.